महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील
अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१५/प्र.क्र.१२८/२०१५/आस्था-३,**
मंत्रालय, बांधकाम भवन,
२५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: २ मे, २०१५.

**शासन आदेश-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने उक्त अधिनियमाच्या कलम ४ (४) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील श्री.ए.टी. गुंडे, सध्या नियुक्तीशिवाय यांची या आदेशान्वये प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, धुळे या रिक्त पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

२. श्री.ए.टी. गुंडे यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/२५६७/ २८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. श्री.ए.टी. गुंडे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५०२१६०९२५५२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarita Rishi Bandekar-Deshmukh

Digitally signed by Sarita Rishi Bandekar-Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarita Rishi Bandekar-Deshmukh
Date: 2015.05.02 16:29:31 +05'30'

( सरिता रि. बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. विभागीय आयुक्त कोकण/नाशिक
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धुळे
४. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
५. मा.मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
७. मा.प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
८. श्री.ए.टी. गुंडे, ४०४, प्लॉट क्र.७५, ॲरिस्टो डिवाईन, सेक्टर १८, खारघर, नवी मुंबई.
९. कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०.निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास व जलसंधारण विभाग